अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-"अ" (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेत बदल करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
# नियोजन विभाग

**शासन आदेश क्रमांकः बदली-१११८/प्र.क्र. ६८/का-१४२७**

मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २० ऑगस्ट, २०१८

संदर्भ :- १) नियोजन विभागाचे कार्यालयीन आदेश क्रमांक - बदली १११८/प्र.क्र.२९/ का.१४२७, दिनांक २० जून २०१८

२) नियोजन विभागाचे कार्यालयीन आदेश क्रमांक - बदली १११८/प्र.क्र.३३/ का.१४२७, दिनांक २० जून २०१८

## शासन आदेश -

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील "उपसंचालक, गट-अ" संवर्गातील श्री.मु.रा.वाडेकर, जिल्हा नियोजन अधिकारी,जिल्हा नियोजन समिती, धुळे यांची जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जळगाव या पदावर संदर्भाधिन क्रमांक १ च्या आदेशान्वये बदलीने पदस्थापना करण्यात आली होती. संदर्भाधिन क्रमांक १ च्या आदेशान्वये श्री.मु.रा.वाडेकर, जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, धुळे यांची करण्यात आलेली बदली या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे.

२. अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील "उपसंचालक (गट-अ)" संवर्गातील श्री.प्र.कौ.पाटील, जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), नाशिक यांची बदली संदर्भाधिन क्रमांक २ च्या आदेशान्वये जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, धुळे या पदावर करण्यात आली होती . सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने संदर्भाधिन क्रमांक २ च्या आदेशातील पदस्थापनेत बदल करण्यात येत असून; श्री.प्र.कौ.पाटील यांची पदस्थापना खालील स्तंभ ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ. क्र. | नाव व पदनाम | दिनांक २०/६/२०१८ च्या आदेशान्वये देण्यात आलेली पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.प्र.कौ.पाटील, जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, नाशिक | जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, धुळे | जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, नंदूरबार |

३. श्री.प्र.कौ.पाटील यांनी बदली केलेल्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. श्री.प्र.कौ.पाटील, जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, नाशिक हयांना बदलीच्या पदावर रुजू होण्यासाठी दिनांक ७/७/२०१८ (म.पू.) पासून संबंधित कार्यालयातून कार्यमुक्त करण्यात आलेले आहे. त्यामुळे श्री.प्र.कौ.पाटील हयांचा जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, नाशिक या पदावरुन कार्यमुक्त झाल्यापासून ते जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, नंदूरबार या पदावर रुजू होईपर्यंतचा कालावधी " नियुक्तीच्या प्रतीक्षेचा कालावधी" नियमित करण्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

४. बदली आदेशात बदल करुन घेण्यासाठी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास तो अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईसाठी पात्र ठरेल.

५. संबंधित कार्यालय प्रमुखांनी संबंधित अधिकाऱ्यांच्या पदाचा पदभार अन्य अधिकाऱ्याकडे सोपवून या अधिकाऱ्यांना बदलीच्या पदावर रुजू होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच बदली केलेल्या पदावर वरील अधिकारी यांना देय / अनुज्ञेय असलेल्या पदग्रहण अवधीत रुजू न झाल्यास संबंधित कार्यालयाने त्यांचे वेतन काढू नये.

६. बदली झालेले अधिकारी बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर त्यांनी तात्काळ संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांशी संपर्क साधून ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची कार्यवाही सात दिवसांच्या आत करावी. अद्ययावत केलेले ई-प्रोफाईल संबंधित कार्यालयाने संबंधित अधिकाऱ्यांच्या त्या महिन्याच्या वेतन देयकासोबत कोषागार कार्यालयास सादर केल्याशिवाय त्यांचे वेतन देयक कोषागार कार्यालयाने पारित करु नये. तसेच, अद्ययावत ई-प्रोफाईलच्या प्रती संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई व शासनास पाठविण्यात याव्यात. ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखांची राहील.

७. काही अधिकारी बदली आदेशाचे पालन करीत नाहीत, त्यामुळे प्रशासकीय कामकाजात अडथळा उत्पन्न होतो असे निदर्शनास आलेले आहे. यास्तव, वरील अधिकाऱ्यांनी त्यांना देय / अनुज्ञेय असलेल्या पदग्रहण अवधीतच बदलीच्या ठिकाणी रुजू व्हावे. याबाबत दिरंगाई झाल्याचे व शासन आदेशाचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधितांविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल ,याची नोंद घ्यावी.

८. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्याबाबतच्या आणि त्यांनी कार्यभार स्विकारल्याच्या आदेशाची प्रत या विभागास अग्रेषित करावी.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८२०११३४२८३११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2018.08.20 15:16:21 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

संबंधित अधिकारी ( मार्फत - अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई).

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा),महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपूर.
२. मा.मुख्यमंत्री / मा.मंत्री (नियोजन)/मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक / धुळे / नंदूरबार
४. आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद
५. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
६. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, नाशिक
७. सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नाशिक
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/ धुळे / नंदूरबार
९. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०.निवड नस्ती.